**अल्पसंख्याकांच्या कल्याणाकरिता मा.पंतप्रधानांच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हा अल्पसंख्याक विकास संनियत्रण समितीची पुनर्रचना करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
**शासन निर्णय, क्रमांक : अविवि- २०१०/प्र.क्र.३/१०/का.९**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २९.४.२०११.

वाचा :-१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.आरएमएन-२००६/९३३/प्र.क्र.९७/०६/३५, दि. ६.१०.२००६.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.आरएमएन-२००८/प्र.क्र.३३/२००८/३५, दि. २६ मार्च, २००८
३) कार्यालयीन ज्ञापन, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, केंद्र शासन नवी दिल्ली क्र. ३ (५३)/२००९-पीपी-II, दि. ६ एप्रिल, २०१०.
४) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक : अविवि- २०१०/प्र.क्र.३/१०/का.९, दि.५ जून, २०१०.
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकःराअआ-२००२/८६८/प्र.क्र.१४२/२००२/३५, दि.७ ऑक्टोबर, २००५,
६) शासन शुध्दीपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकःराअआ-२००२/८६८/प्र.क्र.१४२/२००२/३५, दि.१८ ऑक्टोबर, २००७,
७) शासन शुध्दीपत्रक, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांकःराअआ-२०१०/प्र.क्र.४५/२०१०/का.९, दि.२६ ऑगस्ट, २०१०.
८) कार्यालयीन ज्ञापन, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, केंद्र शासन नवी दिल्ली क्र. ३ (५३)/२००९-पीपी-II, दि. ३ ऑगस्ट, २०१०.

**प्रस्तावना :-**

जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समिती व्यतिरिक्त, केंद्र शासनाच्या सूचनेनुसार अल्पसंख्याकांच्या कल्याणाकरिता मा. पंतप्रधानांनी घोषित केलेल्या नवीन १५ कलमी कार्यक्रमाची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्यासाठी प्रत्येक जिल्हयात जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली ९ शासकीय सदस्यांची जिल्हास्तरीय संनियंत्रण समिती वरील संदर्भ क्र.१ येथील दि.६.१०.२००६ च्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आली आहे.

२. अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार यांच्या दि. ४.१०.२००६ च्या अर्ध शासकीय पत्रातील मार्गदर्शक सुचनांनुसार व वरील संदर्भ क्र.३ येथील दि.६.४.२०१० च्या कार्यालयीन ज्ञापनानुसार सदर समितीची उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ येथील दि.२६.३.२००८ च्या शासन निर्णयान्वये व संदर्भ क्र.४ येथील दि.५ जून, २०१० च्या शासन निर्णयान्वये वेळोवेळी पुनर्रचना करण्यात आली होती.

३.	महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने केलेल्या मागणीनुसार महाराष्ट्रातील अल्पसंख्याक समाजाच्या सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक उन्नतीसाठी तसेच स्थानिक अल्पसंख्याकांच्या समस्या तातडीने सोडविण्यासाठी प्रत्येक जिल्हयात जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समित्या वरील संदर्भ क्र.५ येथील दि.७ ऑक्टोबर, २००५ च्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आल्या आहेत. सदरहू जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समितीमध्ये ७ शासकीय अधिकारी व अल्पसंख्याक समाजातील ६ अशासकीय सदस्यांसह एकूण १४ सदस्यांचा समावेश करण्यात आला होता. सदरहू समितीमध्ये संदर्भाधीन क्र.६ व ७ येथील शासन निर्णयान्वये अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्यांसंदर्भात सुधारणा करण्यात आली आहे.

४.	मा.पंतप्रधानाच्या १५ कलमी कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी स्थापन करण्यात आलेली 'जिल्हा अल्पसंख्याक विकास संनियंत्रण समिती' आणि 'जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समिती' यांची कार्ये व रचना जवळपास समान असल्यामुळे, जिल्हा अल्पसंख्याक विकास संनियंत्रण समितीमध्ये जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समितीची कार्ये समाविष्ट करून, सदर समिती अधिक सर्वसमावेशक व व्यापक करण्याचा तसेच जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समिती बरखास्त करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. तसेच केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.८ येथील दि.३ ऑगस्ट, २०१० च्या कार्यालयीन ज्ञापनान्वये देण्यात आलेल्या सुधारित मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यातील अल्पसंख्याकबहूल ४ जिल्हयांबरोबरच उर्वरित सर्व जिल्ह्यांसाठीही राज्यसभा सदस्यांचे जिल्हा अल्पसंख्याक विकास संनियंत्रण समितीवर नामनिर्देशन करण्याबाबत दिलेल्या सूचनेच्या अनुषंगाने सदर समितीची रचना सुधारित करण्याची बाबही शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्याकाच्या कल्याणाकरिता मा. पंतप्रधानांच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णय, सा.प्र.वि., दि.६.१०.२००६ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या व संदर्भ क्र.२ व ३ येथील दि.२६.०३.२००८, दि.५.६.२०१० अन्वये पुर्नरचित करण्यात आलेल्या "जिल्हा अल्पसंख्याक विकास संनियंत्रण समिती" च्या रचनेमध्ये अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या संदर्भ क्र.८ येथील दि.३.८.२०१० च्या ज्ञापनान्वये दिलेल्या सूचनांनुसार खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

२.	जिल्हा अल्पसंख्याक विकास संनियंत्रण समितीची सुधारित रचना खालीलप्रमाणे राहील.

१) जिल्हाधिकारी - अध्यक्ष
२) जिल्ह्याचे सर्व संसद सदस्य - सदस्य
३) राज्यातील जिल्ह्यांकरिता केंद्र शासनाने नामनिर्देशित केलेले राज्यसभा सदस्य

| अ.क्र. | जिल्हयांचे नांव | नामनिर्देशित सदस्याचे नांव |
|---|---|---|
| १ | नंदूरबार | श्री. तारिक अन्वर |
| २ | जळगांव | श्री. तारिक अन्वर |
| ३ | धुळे | श्री. तारिक अन्वर |
| ४ | अकोला | श्री. भारत कुमार राऊत |
| ५ | अमरावती | श्री. संजय राऊत |
| ६ | वर्धा | श्री. मनोहर जोशी |
| ७ | नागपूर | श्री. विजय दर्डा |
| ८ | भंडारा | श्री. वाय.पी.त्रिवेदी |
| ९ | गोंदिया | श्री. मनोहर जोशी |

| | | |
|---|---|---|
| १० | गडचिरोली | श्री. अविनाश पांडे |
| ११ | चंद्रपूर | श्री. अविनाश पांडे |
| १२ | यवतमाळ | श्री. विजय दर्डा |
| १३ | नांदेड | श्री. विजय दर्डा |
| १४ | जालना | श्री. राजकुमार धुत |
| १५ | औरंगाबाद | श्री. राजकुमार धुत |
| १६ | नाशिक | श्री. अविनाश पांडे |
| १७ | ठाणे | श्री. राजीव शुक्ला |
| १८ | मुंबई उपनगर | श्री. राजीव शुक्ला |
| १९ | मुंबई | श्री. तारिक अन्वर |
| २० | रायगड | श्री. प्रकाश जावडेकर |
| २१ | पुणे | श्री. प्रकाश जावडेकर |
| २२ | अहमदनगर | श्री. गोविंदराव आदिक |
| २३ | बीड | श्री. गोविंदराव आदिक |
| २४ | लातूर | डॉ. जनार्दन वाघमारे |
| २५ | उस्मानाबाद | डॉ. जनार्दन वाघमारे |
| २६ | सोलापूर | श्री. रणजितसिंह विजयसिंह मोहिते पाटील |
| २७ | सातारा | श्री. रणजितसिंह विजयसिंह मोहिते पाटील |
| २८ | रत्नागिरी | श्री. पियुष वेदप्रकाश गोयल |
| २९ | सिंधुदूर्ग | श्री. बाळ आपटे |
| ३० | कोल्हापूर | श्री. ईश्वरलाल शंकरलाल जैन |
| ३१ | सांगली | श्री. ईश्वरलाल शंकरलाल जैन |
| ३२ | परभणी | श्री.गोंविदराव वामनराव आदिक |
| ३३ | बुलढाणा | श्री. राजीव शुक्ला |
| ३४ | वाशिम | श्री. तारीक अन्वर |
| ३५ | हिंगोली | श्री. विजय दर्डा |

४) जिल्ह्याचे सर्व विधानसभा सदस्य - सदस्य

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद - सदस्य

६) जिल्हा पोलीस अधिक्षक / पोलीस उपायुक्त - सदस्य

७) शिक्षणाधिकारी, जिल्हा परिषद / शिक्षणाधिकारी, मनपा - सदस्य

८) जिल्हा समाजकल्याण अधिकारी - सदस्य

९) जिल्हा महिला व बालकल्याण अधिकारी - सदस्य

१०) जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार अधिकारी - सदस्य

११) उपायुक्त, म.न.पा./जिल्हा प्रकल्प अधिकारी (न.पा.प्रशासन) - सदस्य

१२) जिल्हा परिषदेने निर्देशित केलेले एका विषय समितीचे सभापती - सदस्य

१३) ते १५) जिल्ह्यातील अल्पसंख्याकांसाठी काम करणाऱ्या तीन मान्यवर संस्थाचे प्रतिनिधी (यापैकी १ महिला संस्था) - सदस्य

१६) ते १८) जिल्ह्यातील अल्पसंख्याकांसाठी कार्य करणारे तीन अशासकीय सदस्य (यापैकी १ महिला सदस्य) - सदस्य

१९) उपजिल्हाधिकारी - सदस्य सचिव

*पदाची मुदत संपुष्टात आल्यामुळे किंवा अन्य कोणत्याही कारणामुळे संसद सदस्य / विधानसभा सदस्यांचे पद रिक्त झाल्यास जिल्हाधिकारी यांनी त्याबाबतचा अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

अल्पसंख्याक विकास विभागाच्या योजनेशी संबंधित असलेल्या जिल्हयातील विभागप्रमुखांना आढावा बैठकीसाठी निमंत्रित करण्यात यावे.

३. जिल्हाधिकारी यांनी अशासकीय संस्थांचे प्रतिनिधी व अशासकीय सदस्य वगळता त्यांच्या जिल्हयातील सर्व संसद सदस्य, जिल्हयासाठी नामनिर्देशित राज्यसभा सदस्य, जिल्हयातील सर्व विधानसभा सदस्य तसेच समितीतील सर्व अधिकारी यांची बैठक आयोजित करून जिल्हा अल्पसंख्याक विकास संनियंत्रण समितीचे गठन करावे. सदर समितीच्या गठनाचे आदेश व या बैठकीचे इतिवृत्त शासनास सत्वर सादर करावे. या समितीवर अल्पसंख्याकासाठी काम करणाऱ्या तीन मान्यवर संस्थाचे प्रतिनिधी तसेच अल्पसंख्याकासाठी कार्यरत ३ अशासकीय सदस्यांच्या नियुक्त्या शासनाच्या मान्यतेने करण्यात याव्यात. जिल्हाधिकाऱ्यांनी सदर समितीवर नियुक्तीसाठी अशासकीय संस्था व अशासकीय प्रतिनिधींच्या प्राप्त शिफारशी शासनास सादर कराव्यात. अल्पसंख्याकासाठी कार्य करणाऱ्या तीन मान्यवर संस्थाचे प्रतिनिधी आणि अल्पसंख्याकासाठी कार्यरत तीन अशासकीय सदस्यांच्या नियुक्तीचे आदेश शासन स्तरावर निर्गमित करण्यात येतील.

४. **जिल्हा अल्पसंख्याक विकास संनियंत्रण समितीची कार्ये खालीलप्रमाणे असतील :-**

१) मा. पंतप्रधानांच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमाच्या जिल्हास्तरावरील कार्यक्रमाचा आढावा.
२) स्थानिक अल्पसंख्याक समाजाच्या शैक्षणिक समस्यांचा अभ्यास करून राज्य अल्पसंख्याक आयोगास योग्य त्या शिफारशी पाठविणे.
३) अल्पसंख्याक समुदायामध्ये विशेषत: स्त्रियांमध्ये शिक्षणाचा प्रसार करणे.
४) स्थानिक अल्पसंख्याक शैक्षणिक संस्थांचा दर्जा सुधारण्याकरिता योग्य त्या उपाययोजना सूचविणे.
५) अल्पसंख्याकांची गाऱ्हाणी ऐकूण त्यावर वेळोवेळी उपाययोजना सूचविणे.
६) जिल्हयातील अल्पसंख्याकांचे सामाजिक, शैक्षणिक वा आर्थिक सर्वेक्षण करून माहिती पाठविणे.
७) जिल्हयात शांतता व जातीय सलोखा कायम ठेवण्यास प्रशासनास मदत करणे.
८) दंगलपिडीतांचे पुनर्वसन, आर्थिक मदत व बँकेकडून कर्ज मिळवून देण्यास सहाय्य करणे.
९) राज्य शासन व केंद्र शासनामार्फत अल्पसंख्याकांच्या कल्याणासाठी राबविण्यात येणाऱ्या योजनांचा अल्पसंख्याक समुदायांमध्ये प्रसार करणे.
१०) राज्य शासन व केंद्र शासनाकडून अल्पसंख्याक कल्याणाकरिता राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांच्या अंमलबजावणीचा आढावा घेणे.
११) अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, राष्ट्रीय अल्पसंख्याक आयोग व राज्य अल्पसंख्याक आयोग यांच्या जिल्हा दौराप्रसंगी संबंधितांशी सहकार्य व समन्वयाने काम करणे.

५. जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समितीची सर्व कार्ये सदर समितीमध्ये समाविष्ट केल्याने शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.राअआ-२००२/८६८/प्र.क्र.१४२/२००२/३५, दि.७ ऑक्टोबर, २००५ अन्वये निर्माण केलेल्या जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समित्या या आदेशाद्वारे बरखास्त करण्यात येत आहेत.

६. जिल्हा अल्पसंख्याक विकास संनियंत्रण समितीची बैठक जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली दरमहा आयोजित करण्यात येईल. जिल्हाधिकारी यांनी समितीच्या बैठकीचा अहवाल पुढील महिन्याच्या १५ तारखेपूर्वी शासनास व महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांना सादर करावा.

७. जिल्हा अल्पसंख्याक विकास संनियंत्रण समितीच्या अशासकीय सदस्यांना कोणतेही मानधन व बैठक भत्ता देय होणार नाही. अशासकीय सदस्य / अशासकीय संस्था यांचा कार्यकाल नियुक्तीच्या दिनांकापासून तीन वर्ष इतका असेल.

८. सदर शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र.२०११०४२९१५५२३७००१ असा आहे.

सही/-

**( व्यंकटेश भट )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व संबंधित मा. लोकसभा /राज्यसभा सदस्य,
सर्व संबंधित विधानसभा सदस्य,
मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे सह सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई,
संचालक, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, केंद्र शासन, ११ वा मजला, पर्यावरण भवन,
सी.जी.ओ. कॉम्पेल्क्स, नवी दिल्ली- ११०००१
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व पोलीस आयुक्त / जिल्हा पोलीस अधिक्षक,
सचिव,महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,
सर्व शिक्षण अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व शिक्षण अधिकारी, महानगरपालिका,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा महिला व बालकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा रोजगार व स्वयरोजगार अधिकारी,
सर्व महानगरपालिका आयुक्त,
सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी ( न.पा. प्रशासन), जिल्हाधिकारी कार्यालय,
सर्व निवासी उपजिल्हाधिकारी,
निवड नस्ती.